विभागांतर्गत अधिकारी/कर्मचारी यांच्या
नियतकालिक बैठका घेण्याबाबत.

---

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक-एसटीएम-१०९३/सीआर-१६६/९३/१८[र. व का.]
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :-१५ ऑगस्ट, १९९३.

पहावे :- १] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-ओएसडी-१०५६/बी, दिनांक १७ नोव्हेंबर, १९५६.

२] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसटीएम-१०६१/८६७६०-ओ. एम. दिनांक २ डिसेंबर, १९६१.

३] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-एसटीएम-१०६८/ओ. एम., दिनांक ३० ऑक्टोबर, १९६८.

शासन परिपत्रक :- शासकीय कामातील अडीअडचणी समजावून घेऊन शासकीय कामात गती आणण्याच्या दृष्टीने, त्यामध्ये सुधारणा करण्यासाठी, शासकीय रचना व कार्यपध्दतीत बदल सुचविण्यासाठी आणि प्रलंबित कामाचा निपटारा त्वरीत व्हावा याकरीता तसेच शासकीय कर्मचा-यांच्या अडीअडचणी समजावून घेण्यासाठी मंत्रालयीन विभागातील अधिका-यांनी विभागांतर्गत अधिकारी/कर्मचारी यांच्या नियतकालिक बैठका घ्याव्यात असे आदेश वरील परिपत्रकान्वये निर्गमित करण्यात आले आहेत. तथापि ब-याच विभागातून अशा बैठका घेतल्या जात नाहीत असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. सदर आदेश पुढीलप्रमाणे असून या परिपत्रकान्वये त्यांचा पुनरुच्चार व त्यात सुधारणा करण्यात येत आहे.

१. मंत्रालयीन विभागातील सर्व सचिवांनी त्यांच्या अधिपत्याखालील उपसचिवांची आणि अवर सचिवांची कमीत कमी दर पंधरवडयाला बैठक घ्यावी आणि प्रलंबित कामाचा निपटारा लवकर व्हावा याकरीता उपाय योजावेत.

२. प्रत्येक सह/उप सचिवांनी त्यांच्या अधिपत्याखालील अवर सचिव/कक्ष अधिकारी यांची बैठक महिन्यातून एकदा नियमितपणे घ्यावी. एखाद्या सह/उप सचिवाकडे एखाद्या कार्यासनाचे काम स्वतंत्रपणे सोपविले असेल तर त्या कार्यासनातील सर्व कर्मचा-यांची बैठक दर २ किंवा ३ महिन्यातून एकदा नियमितपणे घ्यावी.

कृपा.प. . . .

३. प्रत्येक अवर सचिव/कक्ष अधिकारी यांनी आपल्या कार्यासनातील सर्व कर्मचा-यांची बैठक दर महिन्यातून एकदा नियमितपणे घ्यावी.

४. प्रत्येक विभागातील रचना व कार्यपध्दती अधिकारी यांनी विभागाच्या नोंदणीशाखा, रोख शाखा मधील सर्व कर्मचारी आणि विभागातील लिपिकांची आळीपाळीने बैठक दर तीन ते ४ महिन्यांतून एकदा नियमितपणे घ्यावी.

५. प्रत्येक विभागातील रचना व कार्यपध्दती अधिकारी यांनी त्यांच्या विभागातील सर्व कक्ष अधिका-यांची बैठक दर महिन्याला एकदा नियमितपणे घ्यावी.

या आदेशांचे काटेकोरपणे पालन सर्व संबंधितांकडून केले जाईल याची दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ पे. प्र. महाजन ]
सचिव,
प्रशासकीय सुधारणा व रचना व कार्य.

20170218144431 7407

प्रति,
राज्यपालांचे स्वीय सहाय्यक,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/स्वीय सहाय्यक,
मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
सर्व अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव, सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती/१८[ र. व का. ]